सन २०२३-२४ टंचाई अंतर्गत अमरावती जिल्हयातील तिवसा तालुक्यातील २ तात्पुरत्या नळ पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई-२०२४ /प्र.क्र.४२/पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ०५ जून, २०२४

वाचा-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.२०/पापु १४, दिनांक १४.०२.२०१८
३) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.विकास योजना/पा.टं/कावि/२३६/२०२४, दिनांक ०५.०४.२०२४
४) शासन पत्र क्र.टंचाई-२०२४/प्र.क्र.४४/पापु-१४, दिनांक २५.०४.२०२४
५) शासन पत्र क्र.टंचाई-२०२४/प्र.क्र.४२/पापु-१४, दिनांक ३०.०४.२०२४
६) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र जा.क्र. कक्ष-२७/अ.का./पा.टं/कावि-१५८/२०२४, दिनांक ०९.०५.२०२४
७) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र जा.क्र. कक्ष-२७/अ.का./पा.टं/कावि-१७०/२०२४, दिनांक २२.०५.२०२४
८) भारत निवडणूक आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : ४३७/MH-HP/२०२४(cVigil)/WS-II, दिनांक ०७.०५.२०२४ व दिनांक १७.०५.२०२४

**प्रस्तावना:-**

दिनांक १४.०२.२०१८ च्या परिपत्रकातील मुद्दा क्रमांक ०७ येथील तरतुदीनुसार दिनांक ३१ मार्च, नंतर तात्पुरत्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार क्षेत्रीय कार्यालयास नसल्याने, जिल्हाधिकारी, अमरावती यांनी सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीसाठी तिवसा तालुक्यातील तात्पुरत्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्रमांक ०६ व ०७ येथील पत्रांन्वये शासनास सादर केला आहे.

राज्यामध्ये सन २०२४ च्या लोकसभा निवडणूकीच्या अनुषंगाने दिनांक १६.०३.२०२४ आदर्श आचारसंहिता घोषित झाल्याने तसेच दुष्काळ/दुष्काळसदृष्य घोषित न केलेल्या परंतु टंचाईग्रस्त क्षेत्रात पाणी टंचाई निवारणार्थ राबवावयाच्या उपाययोजनांना परवानगी देण्याच्या प्रस्तावास भारत निवडणूक आयोगाची मान्यता मिळणेकरिता प्रस्ताव सादर करण्यात आला होता, त्यास संदर्भाधीन क्रमांक ०८ येथील पत्रांन्वये भारत निवडणूक आयोगाने मान्यता दिली आहे.

त्यास अनुसरुन अमरावती जिल्ह्यातील तिवसा तालुक्यातील तात्पुरत्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-

जिल्हाधिकारी, अमरावती यांनी सादर केलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये नमुद केलेल्या तिवसा तालुक्यातील २ तात्पुरत्या पुरक नळ पाणी पुरवठा योजनांच्या प्रस्तावांना “विशेष बाब” म्हणून खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, अमरावती यांनी तिवसा तालुक्यातील प्रस्तावित योजनांशी संबंधित गावांमध्ये पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करावे.

२) सदर योजनेच्या कामाचा राजकीय फायदा/लाभ मिळण्याच्या अनुषंगाने आदर्श आचारसंहिता कालावधीमध्ये विपरीत प्रसिध्दी होणार नाही याची जिल्हाधिकारी, अमरावती यांनी दक्षता घ्यावी.

३) सदर प्रस्तावात नमूद केलेल्या तात्पुरत्या पूरक पाणी पुरवठा योजना ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अमरावती यांचेमार्फत राबविण्यात याव्यात.

४) सदर योजनेची कामे अस्तित्वातील नियम विचारात घेऊन विहित पध्दतीने निविदा/ ई-निविदा मागवून करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यात येऊ नयेत.

५) योजनांच्या निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस ) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.

६) निविदा प्रक्रिया दिनांक १४ जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.

७) योजनांची कामे दिनांक ३० जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.

८) योजनांची कामे मंजूर /मान्यता प्राप्त किंमतीमध्येच तातडीने पूर्ण होतील याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्यास शासन जबाबदार राहणार नाही.

९) कोणत्याही कारणाने योजनांच्या खर्चात वाढ झाल्यास त्याकरिता शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

१०) सदर योजनांची प्रस्तावात नमूद केलेली कामे जिल्हा परिषद, अमरावती मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनांची देखभाल दुरुस्ती व योजनांचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायत मार्फत करणे आवश्यक राहील.

११) योजनांची कामे मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनांच्या निविदा प्रक्रियेपासून ते योजनांतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

**२. याबाबत होणारा खर्च "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) " या लेखाशीर्षांखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागवावा व त्याखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०६०५१५५१५७९६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.06.05 16:35:33 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
९. जिल्हाधिकारी, अमरावती
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
११. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अमरावती
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती ( का- पापु-१४)

**शासन निर्णय क्रमांक: टंचाई-२०२४/प्र.क्र.४२/ पापु-१४, दि. ०५ जून, २०२४ च्या सोबतचे परिशिष्ट**

| अ.क्र. | तालुका | कामाचे नाव | रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | तिवसा | मौजे दिवानखेड येथे तात्पुरती पूरक नळ पाणी पुरवठा योजना करणे, ता. तिवसा | ६,११,७९३/- |
| २ | तिवसा | मौजे मार्डी येथे तात्पुरती पूरक नळ पाणी पुरवठा योजना करणे, ता.तिवसा | ६,९३,०९६/- |

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.06.05 16:36:14 +05'30'

(प्रविणकुमार पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन